# डायनासोर म्युझियमला भेट

लेखिका: अलिकी

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



काल मी म्युझियममध्ये डायनासोर बघायला गेलो.
मी आणि माझी छोटी बहीण माझ्या बाबांसोबत तिथे गेलो.
आम्ही एका हॉलमध्ये गेलो, मग वळलो आणि त्या जागी पोहोचलो.
तिथे आम्ही खऱ्याखुऱ्या डायनासोरचा सांगाडा पाहिला.
तो सांगाडा एका घरापेक्षाही मोठ्या असलेल्या खोलीत ठेवला होता.
प्रत्येक सांगाडा जवळजवळ त्या खोलीएवढाच लांब होता.
दिसायला तो भीतीदायक होता.
बाबांनी आम्हाला घाबरू नका असं सांगितलं.
डायनासोर लाखो वर्षांपूर्वी राहात होते.
आज एकही डायनासोर जिवंत नाही.



मी लांबलचक डायनासोर, अपॅटोसोरसचा फोटो काढला.
मी त्याला आणखी जवळ जाऊन पाहिलं.
सांगाड्याची हाडं एकमेकांना तारांनी जोडली होती.
जड लोखंडाच्या सळ्यांनी त्यांना आधार दिला होता.
काही हाडं खरी नव्हती, असं मला दिसलं.
ती प्लास्टरने बनली होती.
या मोठ्या कोड्याचे तुकडे एकत्र जोडणं खूप अवघड काम असलं पाहिजे.
कुणाला हे कसं कळणार की कुठला तुकडा कुठे बसवायचा?





डायनासोर मेले तेव्हा त्यांच्यावर वाळू आणि मातीचं आवरण चढलं.
ते लाखो वर्ष जमिनीत गाडलेल्या स्थितीत राहिले.
मग वाळू आणि मातीचा खडक बनला आणि डायनासोरची हाडं जीवाश्म बनली.
1822 मध्ये, डायनासोरचं पहिलं जीवाश्म सापडलं.
ते अपघातानेच सापडलं.
त्यानंतर खोदकाम करणारे अनेक लोक जीवाश्मांचा शोध घेण्यास गेले.
जमिनीतून जीवाश्म काढणं हे खूप मेहनतीचं काम आहे.
कारण ते कठीण खडकांमध्ये घट्ट रुतून बसलेले असतात.



खोदकाम करणाऱ्या लोकांना डायनासोरच्या हाडांचे जीवाश्म सापडले. डायनासोरने वाळुच्या खड्ड्यात घातलेल्या अंड्यांचे जीवाश्मसुद्धा त्यांना सापडले.



बेबी प्रोटोसेराटॉप्स

त्यांना बेबी डायनासोरचे जीवाश्मही सापडले.

जीवाश्मतज्ज्ञांनी *(पेलेंटॉलॉजिस्ट)* त्या जीवाश्मांचा काळजीपूर्वक अभ्यास केला. जीवाश्मतज्ज्ञ हे भूतकाळातील प्राणी आणि वनस्पतींचा अभ्यास करतात.

जीवाश्मतज्ज्ञांना माहीत असतं की डायनासोर कधी आणि कुठे राहात होते.

त्यांना माहीत असतं की बहुतेक डायनासोर काय खातात.






काही डायनासोर मांस खात. ते मांसाहारी होते.

बरेच डायनासोर वनस्पती खात. ते शाकाहारी होते.

अपॅटोसोरस हा एक महाकाय शाकाहारी डायनासोर होता. तो जिवंत असताना असा दिसत असे. अपॅटोसोरसचे डोळे आणि नाकपुड्या त्याच्या सपाट डोक्यावर उंच जागी होतं.

तो गहिऱ्या पाण्यात चालू शकत असे आणि श्वासही घेऊ शकत असे.

ब्रॅकिओसोरस हा सर्वात वजनदार डायनासोर होता.
काही लोकांनुसार, त्याचं वजन 1,00,000 पौंडपेक्षा जास्त होतं.
ब्रॅकिओसोरसच्या डोक्यावर एक नाकपुडी होती.
तो आपला बराचसा वेळ दलदलीत टनभर मऊ, मुलायम रोपटी खात घालवत असे.
पण तो आपली अंडी सुक्या जमिनीत घालत असे.

डिप्लोडोकस हा सर्वात लांबलचक डायनासोर होता.

तो त्याच्या छोट्याशा डोक्यापासून शेपटीच्या टोकापर्यंत 90 फूट लांब होता.

त्याचं तोंड खूप छोटं होतं आणि त्यात थोडेसेच दात होते.

डिप्लोडोकसला आपलं महाकाय शरीर भरण्यासाठी, न थांबता सतत खावं लागत असे.



इग्वानोडॉन हा एक लहान शाकाहारी डायनासोर होता.

तो बहुतेकदा दोन पायांवर चालत असे.

आपल्या शत्रुशी लढण्यासाठी त्याला काटेरी अंगठे आणि ताकदवान शेपूट होतं.

इग्वानाडॉनला शेकडो सपाट दात होते.

एक दात खराब होऊन पडला की त्याच्या जागी दुसरा दात उगवत असे.



अनॅटोसोरस हा डकबील (बदकाच्या चोचीसारखा जबडा असलेला) डायनासोर होता. तो उत्तम पोहत असे. त्याचे पुढचे पाय जाळीदार होते आणि त्याचा जबडा बदकाच्या चोचीच्या आकाराचा होता.

त्याला अन्न चावण्यासाठी हजारपेक्षाही जास्त दात होते.

ॲलोसोरस हा मांसाहारी होता.

मांसाहारी डायनासोर वेगवान, भयंकर शिकारी होते.

ॲलोसोरस त्याच्या दोन मजबूत पायांवर धावत असे.

त्याला खतरनाक नख्या आणि लांब, टोकदार दात होते.

त्याला वाटेत कुठलाही डायनासोर सापडला तर तो त्याला खाऊन टाकत असे.

आपल्यापेक्षा दुप्पट आकाराच्या डायनासोरवरही हल्ला करायला तो घाबरत नसे.



मग बाबा, बहीण आणि मी दुसऱ्या एका हॉलमध्ये गेलो आणि तिथे आणखी सांगाडे पाहिले.

तिथे लोकांची एवढी गर्दी होती की आम्हाला घाई करावी लागली.



ऑर्निथोलेस्ट्स हा छोटा आणि भयंकर डायनासोर होता.

तो पक्षी पकडण्यात तरबेज होता.



ऑर्निथोमिमसला दात अजिबात नव्हते.

तो बहुधा इतर डायनासोरची अंडी वा फळं आणि किटक खात असे.



अँकिलोसोरस हा चिलखती डायनासोर होता.

तो जमिनीवर राहात असे आणि वनस्पती खात असे.

तो मांसाहारी डायनासोरपासून सुरक्षित होता.

हाडांच्या कवचाचं चिलखत असलेली त्याची जाडजूड, चामडी त्वचा

कुणाला बरं खावीशी वाटेल?

आम्ही स्टेगोसोरस हा प्लेट असलेला डायनासोर बघितला.

त्याच्या पाठीवर मोठी, हाडांची प्लेट होती आणि त्याला एक

खतरनाक, टोकदार शेपूटही होती.

पण त्याचा मेंदू अक्रोडाच्या आकाराएवढाच होता.



आम्ही शिगं असलेले डायनासोरसुद्धा पाहिले.

मोनोक्लॉनिअसच्या नाकावर एक शिंग होतं.



स्टायराकोसोरसला त्याच्या नाकावर एक शिंग होतं आणि त्याच्या मानेभोवती काटेरी गळपट्टा होता.

ट्रायसेराटॉप्सला तीन प्राणघातक शिंगे होती – एक त्याच्या नाकावर होतं आणि त्याच्या प्रत्येक डोळ्याच्या वर एक शिंग होतं.

पंख्याच्या आकाराचं एक मोठं हाड त्याच्या मानेचं रक्षण करत असे.

बाबा म्हणाले, ट्रायसेराटॉप्स स्वत:चं रक्षण करू शकतो, अगदी टायरॅनॉसोरस रेक्सपासूनसुद्धा.

मला नवल वाटलं, कोण होता हा टायरॅनॉसोरस रेक्स?



मग मला तो दिसला.

टायरॅनॉसोरस हा डायनासोरसचा राजा होता.

तो सर्व डायनासोरसमध्ये सर्वात भयंकर होता.

जेव्हा तो आपल्या महाकाय मागच्या पायांवर चालत असे तेव्हा पृथ्वी हलत असे आणि इतर डायनासोर घाबरून पळत असत.

पण टायरॅनॉसोरस त्यांना पकडत असे आणि आपल्या टोकदार दातांनी खाऊन टाकत असे.



टायरॅनॉसोरसचा फोटो काढण्यासाठी मला लांब उभं राहावं लागलं.

टायरॅनॉसोरसच्या शेजारी उभे असलेले बाबा आणि बहीण त्याच्यापुढे अगदी छोटे वाटत होते.

*टायरॅनॉसोरस* जिवंत नाहीत, याचा मला आनंद वाटतो.

तुम्ही म्युझियमला भेट दिलीत, तर तुम्हाला माझ्या म्हणण्याचा अर्थ लक्षात येईल.



समास